# भाग १ जब वी मेट -

# नाशिकाचा अत्तरवाला - कुठे कुठे शोधले नाही तुम्हांस!

**भाग १ जब वी मेट**

अचानक भेटीनंतर त्या एकमेकांचे जीवन कसे बदलले. हे सांगणाऱ्या आवडत्या सिनेमाची आठवण आली म्हणून चित्र सादर -




## *कुठे कुठे शोधले नाही तुम्हांस!*

नाशिक येथे एका स्नेह्यांच्या चिरंजीवांच्या विवाह सोहळ्यात स्नेह भोजनासाठी वाट पाहत असताना एक जण सुगंधी तेलातील काही वस्तू आकर्षक पाकिटातून विकत होते. माझ्या पर्यंत त्यांच्या वस्तू हातोहात संपल्या. जवळपास राहात असल्याने 'आत्ता आणतो' म्हणून ते गायब झाले. बराच वेळ झाला ते का आले नाहीत म्हणून एकांनी मला बाईकवरून त्यांच्या घरी नेले. नेमके कोणी घरी भेटायला आल्यामुळे ते पटकन येऊ शकले नव्हते. मी पटापट पैसे देऊन सुगंधी पॅकेट घेऊन परतताना ते म्हणाले, 'आपले नाव नाही कळले? मी माझे नाव सांगितले. तेव्हा त्यांनी माझा हात हातात घट्ट धरून म्हटले, 'विंग कमांडर शशिकांत ओक? प्रत्यक्ष माझ्या घरी चालत

आलेत? माझा डोळ्यावर विश्वास होत नाहीये हो!" अहो तुम्हाला भेटायला मी काय केले नाही? पुस्तकातील पत्ते, फोन नंबर शोधून वरून मुंबई, नाशिक मधून खेटे मारले. तुमच्या कोरेगाव पार्क मधील फ्लॅटवर चकरा मारल्या. पण तुमची गाठ पडली नाही! आणि आज तुम्ही माझ्या घरात आपणहून मला भेटायला आला आहात! काय हा योगायोग!'

'असे काय कारण होते म्हणून तुम्ही मला शोधत होतात?' मी थक्क होऊन विचारले. यावर ते म्हणाले, 'तुमचे 'नाडी भविष्य - एक चक्रावून टाकणारा चमत्कार' पुस्तक वाचून होतो. चेन्नईच्या शंकर नेत्रालयात डोळ्याला इजा होऊन ठार अंध झालेल्या मित्राचा सहकारी म्हणून आलो होतो. तज्ज्ञांनी त्याला दृष्टी येणे शक्य नाही असे म्हटल्यावर विषण्ण होऊन मरीना बीचवर फिरत होतो. तेंव्हा तांबरम गावातील नाडी केंद्रात तुम्ही नाडी भविष्य पाहिल्याचे आठवले. तिथे मित्राची पट्टी मिळाली. 'अंधत्व आल्याने जीवनात अंधार वाटून तुला तुझा मित्र भविष्य पहाण्यासाठी घेऊन आला आहे! 'काळजी करू नकोस. सांगतो ती शांती-पूजा कर. कठीण शस्त्रक्रिया पार पडून पुन्हा दिसायला लागेल. नंतर तू हे विसरूनही जाशील की तुला पूर्ण अंधत्व कधी आले होते म्हणून!'

माझ्या मित्राला दृष्टी मिळून तो पुन्हा आनंदी जीवनयापन करू लागला. नाडी भविष्यातील ते कथन वेळीच ऐकून शांती-पुजा करून झाल्याने आम्हाला अगस्त्य महर्षींनी जो मानसिक आधार दिला. त्यामुळे त्यांचे आभार मानायचे होते. अगस्त्य महर्षींना भेटणे तर शक्य नाही. आपल्या पुस्तकातील माहितीमुळे नाडी महर्षींचे मार्गदर्शन शक्य झाले. हे सर्व आपल्याला प्रत्यक्ष भेटून सांगायचे होते म्हणून आपला शोध घेत फिरलो. निराश होऊन नाद सोडून दिला. मुंबईतील नोकरी सोडून नाशिकमध्ये हा व्यवसाय सुरू केला. आणि आज अचानक तुम्ही मला शोधत माझ्या घरी आला आहात...! माझा हात हातात धरून गहिवरत ते बोलत होते.

माझ्या डोळ्यातून अश्रु वाहात होते. 'हे महर्षी, आपली लीला अगाध आहे! योग्य वेळ आली की अशक्य ते शक्य करायला तुम्ही प्रेरित करता! जीवनात निराशा, असंतोष असेल तर तो दूर करता! उच्च विचारांच्या कार्याला प्रोत्साहन देता! आपल्याला प्रणाम!' मित्रा, तू हे कथन प्रामाणिकपणे सांगत आहेस ते ठीकच आहे. मी शोधक वृत्तीचा असल्याने सर्व घटना ज्यांच्या संदर्भात झाल्या त्यांच्याकडून ऐकून घटनेची खात्री करून घेणे मला आवश्यक वाटते. तुम्ही मला त्यांचा मो क्र देता का?

...

... 'हॅलो, आपण कोण?... बरं बरं बरं... हो तो मित्र माझा.... माझे शंकर नेत्रालयात

ऑपरेशन झाले?... अं?... हो खरच की!... फार वर्षे झाली त्याला... आता मला व्यवस्थित दिसते. काहीच प्रॉब्लेम नाही! ....

'नंतर तू हे विसरूनही जाशील की तुला पूर्ण अंधत्व कधी आले होते म्हणून!' महर्षींचे बोल खरे झाले...!

# भाग 2 जब वी मेट -

# ताठ मानेचा सार्जंट तादळे...



**भाग २ - जब वी मेट -**

'आजचा दिवस माझा' सिनेमा ज्यांनी पाहिला असेल त्यांना वरील अंध गायकांना महाराष्ट्राचे एक मुख्यमंत्री एका रात्रीत कलाकार कोट्यातून राहायला घर द्यायला सरकारी यंत्रणा कामाला लावून चंग बांधतात आणि प्रत्यक्षातआणतात. ते ज्या कारणाने घडते त्याच्या मुळाशी त्यांचा अहंकार दुखावतो...

कारण त्या रात्रीच्या एका कार्यक्रमाला उपस्थित बडे बडे धनी, प्रतिष्ठित उच्चभ्रू त्यांचा आगमनाप्रित्यर्थ मान राखत उभे राहून अभिवादन करत असतात. पण एक जण खुर्चीवर तसेच बसून राहिलेले दुरून पाहून त्यांना रागाची तिडीक येते. आपला असा

अपमान करणारा कोण? म्हणून पाहता ते अंध गायक असल्याचे त्यांना दिसते. आपल्याला कलाकार कोट्यातील घर मिळावे म्हणून खूप खटपट करून जमत नाही म्हणून एक अर्ज मुख्यमंत्र्यांना देतात. तेंव्हा त्यांचे मत बदलते.
ज्यांच्यासाठी सरकारी योजना राबवल्या जातात त्यांच्यासाठी मुख्यमंत्री पदाच्या सत्तेचा, अधिकाराचा वापर करताना राजकारण बाजूला ठेवून माणुसकीचे दर्शन घडवणारा 'आजचा दिवस माझा...'
...
एकदा मी गणेशोत्साच्या कार्यक्रमात सपरिवार गेलो असताना मी ऑफिसर, मी गणेशोतेसवाच्या कमिटीचा मुख्य म्हणून एयरमन लोक उठून उभे राहण्याची रीतआहे. विशेषतःपत्नी बरोबर असताना ती न पाळणारा पाहून मला राग आला होता इतकाच वरील घटनेशी माझा संदर्भ आहे...
नंतर ... जब वी मेट झाले.

(आठवणी हवाईदलातल्या मधून)

सन १९९३. हवाईदलाच्या तांबरम पोस्टींगवर नुकताच पोहोचलो होतो. तेथील स्टेशनच्या गणेश चतुर्थीच्या आरतीला एयरमन लोकांनी एका हॉलमधे मला बोलावले होते. म्हणून मी कुटुंबासह तेथे पाचारण झालो होतो. मी आल्याचे पाहून तेथील एयरमन लोक उठून उभे राहिले. एक आसामी तरीही खुर्चीत बसून राहिलेले मी पाहिले. नंतर मला नेमकी त्याच्या शेजारची खुर्ची बसायला दिली गेली. आरतीची तयारी चालली होती. तोवरच्या वेळेत शेजारी बसलेल्या व्यक्तीने सुरवात केली, ‘माफ करा सर’ मी उठू शकत नाही. कष्ट पडतात उभे राहायला मी त्याच्याकडे दुर्लक्ष केले. नंतर परतायच्या आधी म्हणाला, ‘सर मला काही मदत करू शकाल का आपण?’ मी तोंड देखले, ‘पाहू काही करता आले तर’ म्हणून गेलो. काही दिवसांनी एक व्यक्ती हातात काठी टेकत टेकत आमच्या क्वार्टरचे फाटक उघडताना मुलीने पाहिले. कोणी चुकून आले की काय असे वाटून ती थबकली.
‘सर आहेत का?’ असे मराठीत विचारल्यावर, ‘हो आहेत’ म्हणून ती मला ‘डॅड कोणी भेटायला आलेत. “सव्वासहा” वाजलेत असे दिसतायत’ म्हणाली. एरव्ही सव्वा आणि पावणे या मराठी शब्दात अडखळणाऱ्या मुलीला तो सव्वासहा म्हणजे कसा? ते पहायला मी उत्सुक झालो. मी बाहेर येईपर्यंत ती व्यक्ती कोचाजवळील खुर्चीत कष्टपुर्वक बसायचा प्रयत्न करीत होती. हातात टेकायच्या काठीवर पुर्ण भाग टाकून टाकून कमरेच्या वरील भाग पुर्णपणे पुढे झुकलेला. जणु काही घड्याळातील काटे ६ वाजून १५ मिनिटांनी जसे दिसतात तसे त्याच्या शरीराचे अवघडलेपण होते... मुलीने

केलेले वर्णन एकदम फिट्ट होते.
मी सार्जंट तांदळे. आल्या आल्या त्याने आपली ओळख सांगून म्हटले, 'आपण गणपतीच्या दिवसात मदत करतो म्हणाला होतात म्हणून फार आशेने आलोय.'
'सर, गेले अनेक महिने मी असा अपंगावस्थेत दिवस काढतोय. क्षुल्लक कारणावरून माझ्या पाठीत बाक येऊन अशी दीन अवस्था झाली आहे. सर्वांगाला ठणका आहे. नक्की निदान कोणाला होत नाही. जो कोणी काही सुचवतो त्याच्या मागे लागून जमेल ते सर्व उपाय करतोय. पण गुण येईल तर शपथ. रोज नाही नाही ते कडेलोटाचे विचार येतात. पण घरच्या निष्पाप बाळांकडे पाहून आणि पत्नीच्या धीर देण्याने मी सावरतो. 'हेही दिवस जातील' असा विचार करून हवाईदलातील दिवस ढकलतोय. दर मेडिकलबोर्डाच्या वेळी मला नोकरीतून काढून टाकायच्या भितीने मन सैरभैर होते. माझ्यासारख्या अधेडवयाच्या अपंग माणसाला बाहेरच्या जगात कोणी दरवाज्यात तरी उभे करील का? असे वाटून मी हवाईदलातील औषधपाण्याच्या खुराकावर दिवस कंठतोय. का कुणास ठाऊक तुम्ही काहीतरी मदत कराल असे वाटले म्हणून मी शारीरिक वेदना सहन करून आपल्या इथे चालत चालत कसाबसा पोहोचलो आहे.'
मला काय बोलावे सुचेना. सहज मदत करीन म्हटलेले तो इतके मनावर घेईल असे वाटले नव्हते. चहाचा कप येईपर्यंत मी इकडचे तिकडचे बोलून वेळ काढला. 'मी म्हणालो खरा पण मला आपल्याला मदत करता येईल असे नाही वाटत' असे म्हटल्यावर तरी तो जाईल असे वाटले. उठता उठता मला म्हणाला, 'सर आपण मला फार निराश केलेत. मी फार आशेने आपल्याला भेटायला आलो होतो. जाऊ दे. इतक्यांनी थट्टा केली त्यात आपली भर पडली.'
मी तरी काय करणार होतो मदत? थोडे आठवले. पण त्याची याला काय मदत होणार असे वाटून मी मनांत विचार टाळला. एक मन म्हणाले, 'आपण सांगून तर पाहू. निदान त्याला आपण विन्मुख पाठवले नाही असे आपल्याला नंतर वाटणार नाही.' आपसुक बोललो, 'इथे नुकताच आल्याने तांबरममधील काही माहिती नाही. पण पुर्वी एकदा माझ्या एका नातेवाईकाच्या मित्राबाबत एकांनी काही मदत केली होती. त्यांचा पत्ता मी तुम्हाला देतो. तेथे पहा काही काम होते का ते. पण त्यासाठी पुण्यात जावे लागेल.' त्याने चेहरा आणखी टाकला. म्हणाला, 'आत्ता तरी मला ते शक्य दिसत नाही. रेल्वेप्रवासाची दगदग, शिवाय तिथे नातलगांची मदत होणार नाही. बराय पहातो काही. आणखी शक्य ते करून.'
... हळू हळू काठी टेकत टेकत ती व्यक्ती डोळ्याआड झाली. काही वर्षांपुर्वी मी

पुण्याला पोस्टींगला असताना अविनाश - माझ्या मेव्हण्याने मला एकांकडे नेले होते. त्याला असे भेटायला जायला आवडे. तेंव्हा तो म्हणाला होता, 'फार पॉवरफुल आहेत ते. मीपण भेटलेलो नाही त्यांना बऱ्याच काळात. फाटक गुरुजी म्हणतात त्यांना. चल तुला भेट घ्ड़वतो.' आम्ही गेलो तोवर त्यांचे निधन झाले होते. असे त्यांच्या पत्नीकडून समजले. वाईट वाटले. मात्र त्यांची गादी आता त्यांची एक मुलगी चालवते. काही त्रास किंवा लागीर असेल तर लोक इथे येतात. आम्ही दिलेल्या मंत्राच्या अंगाऱ्याने उतारा पडतो. ती सर्व गुरूकृपा आहे. आम्ही त्यांच्यावरील दृढ श्रद्धेच्या बळावर मार्गदर्शन करतो. लोकांना गुण येतो.'

त्यांचे बोल मला अचानक सार्जंट तांदळेशी बोलताना आठवले. खरे तर तांदळेच्या शारीरिक व्याधीशी अंगाऱ्या-धुपाऱ्याचा संबंध नव्हता. मी आपला एक उपाय म्हणून सुचवले की एक फाटक गुरुजी म्हणून पुण्यात सहकारनगर भागातील स्टेट बँक कॉलनीत राहतात. त्यांच्याकडे अंगारा व मंत्रोच्चाराने लोकांना गुण येतो असे म्हणतात. पहा त्यांच्याकडून काही मदत होते का ते. असा माझा अनाहूत सल्ला त्याने ऐकलान खरा पण तो खरोखर जाईल याची मला शंका होती... या गोष्टीला बराच काळ लोटला...

...

... 'हू इज देअर' मी करड्या आवाजात कडाडलो. ऑफिसच्या धामधुमीच्या वेळात मी माझ्या प्रशस्त केबीनमधे सहकाऱ्यांशी कामाच्या निमित्ताने चर्चा करत होतो. मधेच माझी नजर दरवाज्याच्या पडद्याकडे गेली. तो कोणी तरी हालवून पहात होते असा भास होत होता... पडदा खरेच हालला. आणि 'मे आय कम इन सर' म्हणून माझ्या हो म्हणायची वाट न पहाता. युनिफॉर्ममधील सार्जंट तांदळे हातातली काठी लांब टाकत आत आला.

'सर मला राहवत नाही हो ... डोळ्यावर विश्वास बसणे शक्य नव्हते. सार्जंट तांदळे काठीच्या शिवाय एक पाऊल न टाकता येणारा. ताठपाठीने मला हस्तांदोलन करायला सरसावत पुढे आला.

'सर काय सांगू. अन् कसं सांगू असे झालयं. सुटीवरून परतलोय ते तुम्हाला केंव्हा भेटतोय असं झालय. सर, पहा काय चमत्कार झालाय. माझी काठी सुटली. पाठ सरळ झाली. माझा जणु काही पुनर्जन्म झालाय.

काय झाले, कसे झाले, सांगताना त्याचे डोळे भरून आले. मला राहावले नाही. मी त्याला बसलेल्या लोकांचा पर्वा न करता छातीशी लावले. महौल काही वेगळा आहे

याची जाण राखून लोक पांगले.

‘सर तुम्ही सांगितलेलेल्या ठिकाणी गेलो होतो. त्या ठिकाणी ताईंनी मला अंगारा दिला आणि मला काही मंत्रून दिलेले सोपस्कार करायला सांगितले व म्हणाल्या, ‘आपल्याला आत्तापासून बरे वाटायला लागेल.’ आणि खरच मला त्यांच्या जिन्याच्या पायऱ्या उतरत असताना जाणवले की माझ्या वेदना दर पायरीनिशी कमी कमी होतायत. खरोखरच त्या दैवी उपायांनी मला उतारा पडला. आणखीन काही दिवस त्यांच्या सानिध्यात घालवून मी आता खडखडीत बरा झालोय. एकदम सर्वांचा या घटनेवर, दैवी उपायांवर विश्वास बसायचा नाही. नस्ते झंझट उभे राहायचे नको म्हणून आणखी काही काळाने हवाईदलातील औषधाचा गुण येऊन मला पुर्णतःठीक झाल्याचे मी इथे लोकांना सांगेन.... त्याच्या नव्या शारीरिक अवस्थेचा उन्मेश, नवा उत्साह, आजही माझ्या मनांत घर करून राहिला होता. ...

...

... सर, नमस्कार. तांदळे बोलतो. आमचे कँपातील ईस्ट स्ट्रीटवरील ऑफिस पहायला जरूर या. मी आपली वाट पहातो. असा मोबाईलवरून प्रेमळ आग्रह झाला आणि मी  दि १६ ऑक्टोबर २०११ला पोहोचलो. हातात पुष्परचना घेऊन. फुल शर्ट-पँट, शूज, टायमधले तांदळेसर आता एक्झिक्युटीव्हच्या थाटात माझे स्वागत करायला हजर होते. त्यांनी त्या नव्या व्यवसायाची सुरवात कशी केली आणि आता त्यांच्या मुलींनी तो व्यवसाय कसा आत्मसात केला आदि वर्णन करून ते म्हणाले, ‘सर आपण प्रेरणादायक व्यक्ती आहात. आता आम्हाला मार्गदर्शन करावे.’ मी थोडा चक्रावून गेलो. आता मी काय सांगणार त्यांना त्यांच्या व्यवसायातील बारकावे. नवे आकृतीबंध, नवी आव्हाने. पण अशी एक उर्मी आली आणि मी सांगत गेलो...जणु हे आधीच माहित होते मला की गरजू लोकांना असे सांगायला यावे म्हणून काही काळापुर्वी मी केलेले एकेक व्यावसायिक प्रयोग. मला असे मदत करतील म्हणून....

एके काळचा निराश अपंग सार्जंट.... आजचा यशस्वी उद्योजक तांदळे सर...



ओठी ओळी येतात ...काय होतास तू.... काय झालास तू...'

... आताचे ताठमानेचे आणि ताठ कण्याचे तांदळेसर कसे दिसतात ते कायम लक्षात राहावे म्हणून... त्यांच्या ऑफिसमधे मी त्यांच्या सोबत एक फोटो काढवला...



# भाग ३ जब वी मेट -

# ये समां समां है प्यार का




ये समां, समां है ये प्यार का...

भोळा शशी...

आमच्या आवडीचे गाणे आम्ही सायंकालीन चहा घेत ऐकत होतो... कहीं दिल ना चुराले मौसम बहार का...

माझे मन मागे मागे गेले... सन १९७३... हवाईदलाचा रुबाबदार निळ्या रंगाचा युनिफॉर्म, पीक कॅप, चकचकीत ब्लॅक पॉलिश केलेले ऑक्सफर्ड पॅटर्न शूज.. जेम्स बाँड टाईप ब्लॅक ब्रीफकेस हातात...छाती ताठ करून लाखो रुपये बॉक्सेसमधे भरून घेऊन जाताना बरोबरचे गन धारी सेक्युरिटी गार्ड्ज...
स्टेट बँक ऑफ इंडियाच्या श्रीनगर लाल चौक मेन ब्रांचमधील मोठ्या हॉलमधील स्टाफकडे नजर फिरवत मी आत जाऊन बँक ऑफिसरच्या केबिनमध्ये बसून चाय की प्याली हातात घेत आहे... पण भिरभिरत्या नजरेने शोध चाललाय तिचा... खाली मान घालून कामात गर्क असलेल्या सुंदरीचे लक्ष कसे वेधले जाईल याची

धडपड... ती ही मला न कळत निहाळते असे वाटत राहणारी हुरहूर...
'कश्मीर की कली है यार'! मित्रांचे सर्टिफिकेट ऐकून मला शम्मी कपूरी 'याऽऽहू' म्हणायची सुरसुरी येत असे...ती होती टीटा... मिस टीटा कौल... काश्मीरी लाल गुलाबी गालावर खळी, मोहक चेहरा, कानावर लटकलेली सोन्याची साखळी... पण ...मन की बात मन में रही... बोलून दाखवायचे साहस नव्हते... श्रीनगर सोडून पुढे सरकलो...
...
घटनांच्या ओघात सन १९७७ मधे पुन्हा श्रीनगरमध्ये पोस्टींगला आलो. फॅमिली घेऊन रावलपुरा कॉलनीत राहात होतो. हिला तिला पहायची उत्सुकता होती. एक दिवस आम्ही दोघे मुद्दाम स्टेट बॅंकेच्या ऑफिसमध्ये तिला भेटलो. जुजबी बोलत १० मिनिटात भेट संपली. बाहेर पडून  बाजारात शाली, केशर घेता घेता तिच्या सुंदरतेचे वर्णन हिच्या कडून ऐकताना मला माझ्या चॉईसचा अभिमान वाटला! ती आता पर्यंत मिसेस धर झाली होती. मांग सिंदूरी, कानांवरील आभूषण तिच्या सौंदर्याला खुलवत होती...  ती सीनियर अधिकारी झाली होती. आपल्या केबिनमधे मला चहा ऑफर करत म्हणाली होती, 'सॉरी टू हियर अबाऊट दॅट...' आपत्ती जनक घटनेची माहिती समजताच माझी सांत्वना करताना करुणा वाटून तिने शब्द जुळवले...
...
साल १९९६ मधे पुन्हा श्रीनगरला पोस्टींगला आलो. आता स्टेट बॅंकेची शाखा एयरपोर्टवर सुरू झाली होती. बदलत्या राजकीय परिस्थितीत आता मेन ब्रांचला जाणे दुरापास्तच होते. ती आता तिथे असेल का? कशी असेल? वगैरे जाणून घेण्याची उत्सुकता ताणली होती!
कसे तरी करून बॅंकेत गेलो. अवकळा आलेली बिल्डिंग, सेक्युरिटीने गढीवजा चारी बाजूने घेरलेले... आतला स्टाफ आता नमाझी टोपीतला.
'सर, आपको पता होगा. सभी कश्मीरी पंडितों को वेली के बाहर भागना पड़ा. ९० के पहले मिसेस टीटा धर अपनी फॅमिली के साथ दिल्ली चली गई...गाझियाबाद के कॅम्प में रहते थे...इतने तक पता है.. बाद का मालूम नहीं'...
... तिच्यावर आलेल्या दारुण आपत्तीतून ती सावरली असेल असे करुणेने मनापासून वाटत राहते...
**... दिल ढूंढता है फिर वही...**